**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन आदेश क्रमांकः कअनि - १११५/प्र.क्र. ६८/१४-ब**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : ०९ मे, २०१७

**संदर्भ-** १) सा.प्र.वि. आदेश क्र. प्रतिनि-१०१२/प्र.क्र.१७९/का.१४, दि.२५.०२.२०१३
२) सा.प्र.वि. आदेश क्र. प्रतिनि-१०१२/प्र.क्र.१७९/का.१४, दि.०४.०७.२०१४
३) सा.प्र.वि. आदेश क्र. कअनि-१११५/प्र.क्र.६८/का.१४-ब, दि.२८.०५.२०१५
४) सा.प्र.वि. आदेश क्र. कअनि-१११५/प्र.क्र.६८/का.१४-ब, दि.३१.०५.२०१६

**आदेश**

श्री. श.व.दळवी, कक्ष अधिकारी, ग्रामविकास व जलसंधारण विभाग यांच्या सेवा संदर्भाधीन क्र. १ च्या आदेशान्वये ग्रामविकास व जलसंधारण विभागाच्या अधिपत्याखालील महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियाना अंतर्गत, राज्य मिशन व्यवस्थापन कक्ष, बेलापूर, नवी मुंबई कार्यालयातील कक्ष अधिकारी या पदावर एक वर्षाच्या कालावधीसाठी प्रतिनियुक्तीने उपलब्ध करून देण्यात आल्या होत्या. श्री. दळवी महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियाना अंतर्गत, राज्य मिशन व्यवस्थापन कक्ष या कार्यालयात दिनांक ०१.०४.२०१३ पासून प्रतिनियुक्तीने कार्यरत आहेत. श्री.दळवी, कक्ष अधिकारी यांच्या प्रतिनियुक्तीच्या कालावधीस संदर्भाधीन क्र. २, ३ व ४ च्या आदेशान्वये प्रत्येकी एक वर्षांची मुदतवाढ देण्यात आली असून त्यांचा प्रतिनियुक्तीचा कालावधी दिनांक ०१.०४.२०१७ रोजी संपुष्ठात आला आहे. ग्रामविकास व जलसंधारण विभागाने महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियान हे जून २०१८ मध्ये संपत असल्याचे कळवून श्री. दळवी, क.अ. यांच्या प्रतिनियुक्तीच्या कालावधीस मुदतवाढ देण्याची विनंती केली आहे.

त्याअनुषंगाने, या आदेशान्वये श्री. दळवी यांच्या प्रतिनियुक्तीच्या कालावधीस दिनांक ३०.०६.२०१८ पर्यंत मुदतवाढ देण्यात येत आहे. श्री. दळवी, क.अ. यांना दिनांक ३०.०६.२०१८ नंतर प्रतिनियुक्तीच्या पदावरून कार्यमुक्त करणे बंधनकारक राहील.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०५०९१२५४०१२७०७ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Gajanan Bhimrao Gurav

Digitally signed by Gajanan Bhimrao Gurav
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=General Administration, postalCode=400032, st=Andhra Pradesh, 2.5.4.20=8a5b973b0795ae988a7c005050f9180a8021798a5c1ed41ada8a72725a47b4f0, cn=Gajanan Bhimrao Gurav
Date: 2017.05.09 12:54:11 +05'30'

**( ग.भि.गुरव )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति**

श्री.श.व.दळवी, कक्ष अधिकारी, , राज्य मिशन व्यवस्थापन कक्ष क्र. १०१ व १०२, मोनार्क प्लाझा, प्लॉट नं.५६, सेक्टर-११, बेलापूर, नवी मुंबई .

**प्रत,**

१) सचिव , ग्रामविकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.

२) सह/ उप सचिव (आस्थापना), ग्रामविकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई -३२.

३) उप सचिव (योजना-३), ग्रामविकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.

४) मुख्य कार्यकारी अधिकारी, राज्य मिशन व्यवस्थापन कक्ष क्र. १०१ व १०२, मोनार्क प्लाझा, प्लॉट नं.५६, सेक्टर-११, बेलापूर, नवी मुंबई .

५) निवड नस्ती / संग्रहार्थ